**श्री.चंदूसिंग रामदास राठोड यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# जलसंपदा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एसयुटी-२०१५/(३१०/२०१५)/आ (वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.

**तारीख: २१ डिसेंबर, २०१६.**

<u>वाचा:-</u> १) जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एसएलएस-१११२/(३६४/२०१२)/आ.(वर्ग-१)..(२), दि.२४.१०.२०१३.
२) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र.उअज्ये-२०१०/(प्र.क्र.२१/१३)/आ.(ज्येष्ठता), दि.०८.११.२०१३.
३) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र.उअज्ये-२०१४/(प्र.क्र.११७/१४)/आ.(वर्ग-२), दि.३१.०७.२०१४.
४) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांचे दि.२९.०४.२०१६ चे आदेश.
५) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्र.काअज्ये-१११५/(४९९/२०१५)/आ.(वर्ग-१), दि.२५.०५.२०१६.

**<u>प्रस्तावना</u>:-**

श्री.चंदूसिंग रामदास राठोड, सेवानिवृत्त उप विभागीय अभियंता यांनी त्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गाच्या पदोन्नतीचा मानीव दिनांक मिळण्यासंदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे मूळ अर्ज क्र.११६/२०१५ दाखल केलेला आहे. सदर प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने संदर्भीय क्र.४ अन्वये खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत:-

a) The O.A. is partly allowed.

b) The respondents are directed to promote the applicant as Executive Engineer with the same deemed date as his immediate junior who was promoted.

c) The applicant pay on promotion to the cadre of Executive Engineer will be only notional and it will count towards granting pensionery and other retrial benefits as he stood before he could be promoted.

d) Necessary orders as above will be issued within 8 weeks of receipt of this order.

२. उपरोक्तप्रमाणे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी दिलेल्या निर्देशानुसार, श्री.राठोड यांना सेवा कनिष्ठ असलेले श्री.विश्वासराव लालासाहेब माने यांचा कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक ३०.०४.२०१२ हा श्री.राठोड यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांनी या प्रकरणी दिलेले अभिप्राय विचारात घेऊन, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी श्री.राठोड यांचे प्रकरणी दि.२९.०४.२०१६ रोजी दिलेल्या आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने, श्री.राठोड यांना सेवा कनिष्ठ असलेले श्री.विश्वासराव लालासाहेब माने यांचा कार्यकारी अभियंता पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक दि.३०.०४.२०१२ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात येत आहे.

२. श्री.राठोड यांना कार्यकारी अभियंता पदावरील दि.३०.०४.२०१२ या मानीव दिनांकाचा लाभ मा.न्यायाधिकरणाने आदेशीत केल्यानुसार फक्त निवृत्तीवेतन व सेवानिवृत्तीविषयक व इतर लाभाच्या प्रयोजनासाठी अनुज्ञेय राहील. सदर मानीव दिनांक मंजूरीच्या अनुषंगाने श्री.राठोड यांना काल्पनिक वेतननिश्चितीच्या कालावधीची थकबाकी अनुज्ञेय ठरणार नाही.

३. हे आदेश सामान्य प्रशासन विभाग (का.१२) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६८४/२०१६, दि.३०.११.२०१६ व वित्त विभाग (सेवा-३) यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६५३/२०१६, दि.१५.१२.२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१६१२२११४४०३६२५२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2016.12.21 15:24:16 +05'30'

**(अतुल कोदे)**
**शासनाचे सह सचिव**

प्रत,

१) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
४) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
५) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
६) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
७) खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
८) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
९) सामान्य प्रशासन विभाग (का.१२), मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग (सेवा-३), मंत्रालय, मुंबई.
११) संबंधीत अधिकारी.
१२) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.